**राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत देण्यात येणाऱ्या प्रशासकीय व तांत्रिक प्रशिक्षणासाठी अर्थसंकल्पिय करावयाच्या तरतूदींबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक: टीआरएन २०१४/२४३/प्र.क्र.३८/१४/१२-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दिनांक : २२ एप्रिल, २०१५

वाचा : १. शासन निर्णय क्रमांक- टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि. २३.९.२०११

परिपत्रक:

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्याचे प्रशिक्षण धोरण निश्चित करण्यात आले आहे .त्यामध्ये राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत घेण्यात येणा-या सर्व प्रकारच्या प्रशिक्षणासाठी निधी अर्थसंकल्पीत करण्याच्या तरतूदी विषद करण्यात आल्या आहेत .मात्र विविध मंत्रालयीन विभागांकडून प्रशिक्षणासाठीच्या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित केलेला निधी तांत्रिक प्रशिक्षणासाठी उपयोगात आणावा की, प्रशासकीय प्रशिक्षणासाठी उपयोगात आणावा अशा प्रकारचे प्रश्न उपस्थित होत आहेत .तसेच ,प्रशासकीय प्रशिक्षणाकरिता यशदा पुणे ,या संस्थेकडून विविध मंत्रालयीन विभागांकडे निधीची मागणी केली जात असून ,त्यानुसार संबंधित विभागांकडून या विभागांकडे अशा निधीची मागणी केली जाते , असे निदर्शनास आले आहे .

**राज्य प्रशिक्षण धोरणाच्या शासन निर्णयामधील परिच्छेद ८ मध्ये " प्रत्येक शासकीय विभाग वर्षाच्या सुरुवातीला प्रशिक्षण आराखडा तयार करेल व त्यानुसार त्या आर्थिक वर्षाच्या त्या शासकीय विभागाच्या अर्थसंकल्पात आवश्यक तरतूद करेल. राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणेसाठी लागणारी आर्थिक तरतूद तसेच प्रशासनिक व सेवांतर्गत प्रशिक्षण आणि प्रशिक्षणार्थींच्या परीक्षा / प्रमाणपत्रे यासाठीची यशदास व विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था तसेच जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण केंद्रासाठी लागणारी आर्थिक तरतूद त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पात सामान्य प्रशासन विभागामार्फत करण्यात येईल. सदर प्रशिक्षण धोरण योजना ही योजनांतर्गत योजना म्हणून राबविण्यात येईल." असा उल्लेख आहे.**

२. त्यानुषंगाने उपरोक्त बाबी विचारात घेऊन, सर्व मंत्रालयीन विभागांना व या विभागाच्या अधिनस्त सर्व संस्थांना आता खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. राज्य प्रशिक्षण धोरणानुसार उप महासंचालक,राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा, यशदा पुणे, यांनी प्रत्येक कॅलेंडर वर्षात सर्व संबंधित प्रशासकीय विभागांकडून त्यांच्या अधिनस्त असलेल्या कार्यालयांसहित, तांत्रिक व प्रशासकीय प्रशिक्षणाचा आढावा घ्यावा. सदर आढाव्यानुसार, यशदातील प्रत्येक मंत्रालयीन विभागाच्या समन्वय अधिकारी ( Liaison officer ) यांनी प्रशिक्षणाचा आराखडा तयार करुन, विभागाच्या तांत्रिक प्रशिक्षणाचा आराखडा संबंधित विभागास व प्रशासकीय प्रशिक्षणाचा सर्व विभागांचा एकत्रित तसेच स्वतंत्र आराखडा आवश्यक असलेल्या निधीच्या रकमेसह सामान्य प्रशासन विभागास सादर करावा.

२. या दोन्ही प्रशिक्षणांकरिता विभागनिहाय व जिल्हानिहाय प्रशिक्षण आराखडा अंतर्भूत असावा.

३. यशदाने सदर प्रशिक्षणांकरिता निधीची मागणी करतांना, पुढील कॅलेंडर वर्षात लागणा-या आर्थिक निधीची तरतूद चालू कॅलेंडर वर्षाच्या ऑक्टोबर / नोव्हेबर मध्ये संबधित विभागाकडे तांत्रिक प्रशिक्षणासाठी व प्रशासकिय प्रशिक्षणासाठी सामान्य प्रशासन विभागाकडे करावी.

४. सदर निधीची मागणी मंत्रालयीन विभागास उप महासंचालक, राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा, (STPEA) यशदा पुणे, यांच्या मार्फत करण्यात यावी.

५. तांत्रिक प्रशिक्षणाकरिता, प्राप्त आराखडयानुसार आर्थिक तरतूद संबंधित विभागाने, विभागाच्या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित करावी व त्यामधून विभागाने सदर खर्च करावा.

६. त्याचप्रमाणे प्रशासकीय प्रशिक्षणाकरिता, प्राप्त आराखडयानुसार, आर्थिक तरतूद संबंधित लेखाशिर्षाखाली सामान्य प्रशासन विभागामार्फत करण्यात येऊन, त्याप्रमाणे यशदा मार्फत विभागीय प्रशिक्षण संस्था / जिल्हा प्रशिक्षण संस्थांना निधी वितरित करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

३. सर्व मंत्रालयीन विभागांनी तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या अधिनस्त असलेल्या यशदा पुणे, यांनी त्याचप्रमाणे विभागीय प्रशिक्षण संस्थाना / जिल्हा प्रशिक्षण संस्थांनी वरील सूचनांची योग्य ती नोंद घेऊन आवश्यक कार्यवाही विहित वेळेत करावी.

४ सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०४२२१७५८०४०३०७ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.04.22 18:16:51 +05'30'

**( डॉ. भगवान सहाय )**
**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति -**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई *
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
५ .सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
६. सर्व विभागीय आयुक्त,
७. सर्व जिल्हाधिकारी.

८. महासंचालक, यशदा, बाणेर रोड, पुणे-४११ ००७

९. महासंचालक, राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, पुणे

१०. संचालक, राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, पुणे

११. संचालक, कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, (रामेती), खोपोली, शिळफाटा, ता. खालापूर, जिल्हा - रायगड

१२. संचालक,नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक

१३. संचालक, प्रादेशिक कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था ( रामेती ), पुणे

१४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन संस्था, वनामती, नागपूर

१५.विशेष कार्य अधिकारी, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर), पैठण, जिल्हा- औरंगाबाद.

१६. विशेष कार्य अधिकारी,डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नवीन प्रशासकीय इमारत, तपोवन रोड, अमरावती विद्यापीठासमोर, जिल्हा- अमरावती.

१७. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र-१, मुंबई

१८. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र-२, नागपूर

१९. महालेखापाल, लेखा परीक्षा,महाराष्ट्र-१ मुंबई

२०. महालेखापाल, लेखा परीक्षा,महाराष्ट्र-२ नागपूर

२१. स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव, ( सेवा ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२२. निवड नस्ती-१२-अ, साप्रवि, मंत्रालय, मुंबई-३२

* पत्राने